**एशियन डेव्हलपमेंट बँक अर्थसहाय्यित शाश्वत किनारा संरक्षण व व्यवस्थापन प्रकल्पाची अंमलबजावणी, संनियंत्रण व देखरेख ठेवण्यासाठी मा. मुख्यसचिव यांचे अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेली समिती रद्द करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकिर्ण- ०११५ /प्र.क्र. १७ /बंदरे-१(२),**
३० वा मजला, सेंटर-१,जागतिक व्यापार केंद्र,
कफ परेड, मुंबई ४०० ००५.
तारीख: ५ मार्च,२०१५.

वाचा :-

१) **शासन निर्णय क्रमांकः गृह विभाग, क्र. पीएलएन-१२१२/प्र.क्र.४२/बंदरे-२, दि.७ सप्टेंबर, २०१२**

**शासन निर्णय :-**

एशियन डेव्हलपमेंट बँक अर्थसहाय्यित शाश्वत किनारा संरक्षण व व्यवस्थापन प्रकल्प राबविण्यास शासन निर्णय क्र. पीएलएन १२०९/ प्र.क्र. २४९/ बंदरे-२, दिनांक २६ ऑक्टोबर, २०१० च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. या संपूर्ण प्रकल्पाच्या कार्यान्वयनाची जबाबदारी मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड यांच्याकडे सोपविण्यात आली असून, प्रकल्पाच्या अंमलबजावणीसाठी विविध यंत्रणांसोबत करारनामे स्वाक्षांकित करण्यास, तसेच प्रकल्पात समाविष्ट असलेल्या सर्व कामांना प्रशासकीय मान्यता देण्यास मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड यांना प्राधिकृत करण्यात आले आहे. या प्रकल्पाची असलेली किंमत, त्यासाठी एशियन डेव्हलपमेंट बँकेचा कर्ज हिस्सा, राज्य शासनाचा हिस्सा आणि खाजगी हिस्सा या बाबी विचारात घेऊन तसेच एशियन डेव्हलपमेंट बँकेचे कर्ज हे केंद्र शासनामार्फत राज्य शासनास उपलब्ध होणार असुन या कर्जाची परतफेड राज्य शासनास करावी लागणार असल्याने व या कर्जास राज्य शासनाने हमी दिली असल्याने मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली क्र. पीएलएन-१२१२/प्र.क्र.४२/बंदरे-२, दिनांक ७ सप्टेंबर, २०१२ च्या शासन निर्णयान्वये समिती गठीत करण्यात आलेली होती. तसेच सदर प्रकल्पाच्या अंमलबजावणीसाठी, संनियंत्रण व देखरेख ठेवण्यासाठी दिनांक ५ डिसेंबर,२०१२ च्या शासन निर्णयान्वये मा. प्रधान सचिव (बंदरे) यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठित करण्यात आली होती. परंतु सद्य:स्थितीत बंदरे विभागासाठी, अपर मुख्य सचिव (बंदरे) यांची नियुक्ती करण्यात आली आहे.

यास्तव, मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली क्र. पीएलएन-१२१२/प्र.क्र.४२/बंदरे-२, दिनांक ७ सप्टेंबर, २०१२ च्या शासन निर्णयान्वये गठीत करण्यात आलेली समिती रद्द करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३०३१२४५५०१३२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vidyadhar Avinash Malegaonkar

Digitally signed by Vidyadhar Avinash Malegaonkar
DN: CN = Vidyadhar Avinash Malegaonkar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Home
Date: 2015.03.05 14:37:05 +05'30'

**( वि. अ. मालेगावकर )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग**

प्रत,

१) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) अपर मुख्य सचिव, (परिवहन व बंदरे), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) प्रधान सचिव, पर्यावरण विभाग,मंत्रालय, मुंबई.
५) सचिव ( बांधकाम ), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई.
७) मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक.
८) निवडनस्ती, बंदरे-२